**भारतीय प्रशासन सेवेतील अधिका-यांच्या रजा - मंजूरी प्राधिकारी निश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक, क्रमांक : एईओ-१०११/प्र.क्र.४९/२०११/दहा,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- २९.०१.२०११.**

**शासन परिपत्रक :-**

भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांना अध्ययन, बाल संगोपन व नैमित्तिक रजा वगळून सर्व रजा (अर्जित रजा / समर्पित रजेसह, अर्धवेतनी रजा, प्रसूती रजा इ.) तसेच या रजेच्या कालावधीत रजा प्रवास सवलत व रजा रोखीकरण मंजूर करण्यास पुढीलप्रमाणे प्राधिकारी निश्चित करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अधिका-यांच्या रजा | रजा मंजूर करण्यास सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|
| १ | i) मंत्रालयीन विभागांचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव यांच्या रजा.<br>ii) मंत्रालयाबाहेरील कोणत्याही पदावर कार्यरत असलेले अपर मुख्य सचिव श्रेणीतील अधिकारी यांच्या रजा.<br>iii) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई, उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, सिडको, नवी मुंबई, महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (एमएमआरडीए), उपाध्यक्ष व मु.का.अ.,म्हाडा यांच्या रजा. | **मुख्य सचिव** |
| २ | उपरोक्त अनुक्रमांक १ येथील अधिकारी वगळून, अधिकालिक वेतनश्रेणीतील व त्यावरील श्रेणीतील उर्वरीत अधिका-यांच्या रजा, तसेच निवडश्रेणी व त्या खालील श्रेणीतील अधिका-यांच्या ३० दिवसांपेक्षा अधिक कालावधीच्या रजा. | **अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव(सेवा)** |
| ३ | निवडश्रेणी व त्या खालील श्रेणीतील अधिका-यांच्या ३० दिवसांपर्यंत कालावधीच्या रजा. | **उप सचिव/सह सचिव (सा.प्र.वि./१०)** |

२. अधिकालिक किंवा त्यावरील वेतन श्रेणीतील एखाद्या अधिका-याच्या रजेची शिफारस त्याच्या पर्यवेक्षिय अधिका-याने केली नसेल, पण रजा मागणा-या अधिका-याचा आग्रह असेल तर, अशी प्रकरणे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (सेवा) हे मुख्य सचिवांना, त्यांच्या शिफारशीसह सादर करतील.

३. उपरोक्तप्रमाणे रजा मंजूर करण्यास सक्षम असलेले प्राधिकारी हे संबंधित अधिका-यास रजेच्या कालावधीत रजा प्रवास सवलत (LTC) व रजा रोखीकरण (Leave Encashment) मंजूर करण्यास तसेच खाजगीरित्या विदेशात जाण्यास परवानगी देण्यास, सक्षम असतील.

४. उपरोक्तप्रमाणे रजा मंजूरी प्राधिकारी लक्षात घेऊन, तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.-एईओ-१००९/प्र.क.२६२/२००९/दहा, दि.०३.०६.२००९ मधील सूचना विचारात घेऊन, भाप्रसे अधिका-यांनी रजेचे अर्ज सादर करावेत.

५. ज्या प्रकरणी रजा मंजूरी प्राधिकारी मुख्य सचिव आहेत, त्या प्रकरणी संबंधित अधिका-यांनी आपला रजेचा अर्ज मुख्य सचिवांना संबोधित करावा, पण त्याचवेळी अर्जाची आगाऊ प्रत अवर सचिव, सा.प्र.वि./कार्यासन-१० यांच्याकडेही पाठवावी, जेणेकरून अशा रजेची प्रकरणे कार्यासनातून त्वरीत सादर करता येतील.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०११०१२९१९०२२०००१ असा आहे.**

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( के. पी. बक्षी )**
**प्रधान सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
४. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
५. मुख्य सचिवांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
६. महाराष्ट्र संवर्गातील सर्व भा.प्र.से. अधिकारी,
७. सर्व मंत्रालयीन विभाग,
८. अवर सचिव/का.क्र. ९ व ९-अ, सामान्य प्रशासन विभाग,
**९. निवड नस्ती. (एस.ए.मार्फत)**